श्री.उध्दव नामदेव शिंदे मराठवाडा सर्व श्रमीक संघटना, परभणी व इतर २७ रोजंदारी मजूर यांनी दाखल केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद यांनी दि.१२/७/२०१९ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार तालुका फळरोपवाटिका (कृ.चि.वि.) बिंदुसरा, ता.जि.बीड येथील २७ रोजंदारी मजूरांना वेतनाच्या फरकाची रक्कम अदा करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आयडीअे-२०१८/प्र.क्र.१२३/१३-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २० ऑक्टोंबर,२०२१

**वाचा:-**

१) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. आयडीअे-२०१८/१२१८/१७३५२/प्र.क्र.१३५/आस्था-३/३१९४३, दि.१०/१२/२०२०.

२) मा. कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे दाखल आयडीअे क्र. १६/२०१५ बाबत दिलेला दि.२०/४/२०१८ चा न्यायनिर्णय.

३) मा. उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे दाखल रि.पि. क्र. ६१५२/२०१९ बाबत दिलेला दि.१२/७/२०१९ चा न्यायनिर्णय.

**प्रस्तावना:-**

तालुका फळरोपवाटिका, बिंदुसरा, जिल्हा बीड येथील रोजंदारी मजूरांना कायम मजूराच्या मासिक वेतनाच्या १/२६ दराने रोजंदारीचा मागील फरक मिळावा म्हणून श्री.उध्दव शिंदे, मराठवाडा सर्व श्रमिक संघटना व २७ रोजंदारी मजूरांनी त्यांना देय असलेली रक्कम त्यांना द.सा.द.शे.१८ दराने न मिळाल्याने त्यांनी आयडीअे अर्ज क्र.१६/२०१५ मा.कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे दाखल केले होते. त्यामध्ये मा.कामगार न्यायालय, औरंगाबाद यांनी दि.२०/४/२०१८ रोजी न्यायनिर्णय दिलेला असून तक्रारदार रोजंदारी मजूर यांना प्रपत्र-"अ" मध्ये त्यांचे नावासमोर दर्शविलेली १/२६ दरांची रक्कम प्रत्यक्ष अदायगी पर्यंत द.सा.द.शे. १० दाराने अदा करण्याचे व सदर कार्यवाही निर्णयापासून ३ महिन्याच्या कालावधीत करण्याचे निर्देश विभागास दिलेले होते. सदर न्यायनिर्णय शासनाच्या विरोधात झाल्याने मा.उच्च न्यायालय येथे अपील दाखल करणेसाठी विधी व न्याय विभाग, औरंगाबाद यांनी सदर प्रकरण उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल करण्यास

मान्यता देण्यात आली होती. मा. उच्च न्यायालयखंडपीठ, औरंगाबाद येथे अपील रिट पिटीशन क्र.६१५२/२०१९ दाखल करण्यात आले होते. सदर रिट पिटीशनचा निकाल दि.१२/७/२०१९ रोजी शासनाच्या विरोधात झाला होता. २७ रोजंदारी मजूरांना तक्रार अर्जाच्या परिशिष्ट-ए मध्ये तक्रारदारांच्या नावा समोर दशविलेली कायम कामगारांच्या वेतनाच्या १/२६ दराने थकीत मजुरीच्या फरकाची रक्कम द.सा.द.शे. ६ दराने तक्रार दाखल केल्याच्या दिनाकांपासून प्रत्यक्ष अदा करेपर्यंत अदा करण्याचे आदेश दिलेले होते. त्याअनुषंगाने कृषि आयुक्तालयाने सादर केलेल्या प्रस्तावातील मजूरांना फरकाची रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

आयडीअे क्र.१६/२०१५ मध्ये सहसचिव श्री. उध्दव नामदेव शिंदे, मराठवाडा सर्व श्रमिक संघटना व इतर-२७ यांनी दाखल केलेल्या प्रकरणी मा.कामगार न्यायालयाने दि.२०/४/२०१८ रोजी दिलेल्या न्यायनिर्णया विरुध्द शासनाने मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे रि.पि.क्र.६१५२/२०१९ दाखल करण्यात आले होते. यामध्ये दि.१२.७.२०१९ रोजी शासनाच्या विरोधात अंतिम न्यायनिर्णय झाला असून सदर न्यायनिर्णयानुसार २७ रोजंदारी मजूरांना कायम कामगारांच्या वेतनाच्या १/२६ दराने थकीत मजुरीच्या फरकाची रक्कम रु.३८,१४,१६०/- (रुपये अडतीस लाख चौदा हजार एकशे साठ मात्र) अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. न्यायालयीन प्रकरणात वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ दि.१७/४/२०१५ भाग-पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक-२, नियम क्रमांक-७ नुसार प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. या अधिकारानुसार रोजंदारी मजूरांच्या वेतनाच्या फरकाची रक्कम वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. आयुक्त (कृषि) कार्यालयाने मा.न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयानुसार देय ठरणारी रक्कम शासनाचे प्रचलित नियम, अटी व शर्ती व आदेशांचे अनुपालन करुन वितरीत करण्यात यावी. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय वा वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

४. यावरील येणारा खर्च मागणी क्र.डी-३, २४०१-पिकसंवर्धन, ११९ बागायती व भाजीपाला, ११९(०३) रोपमळे, (०३)(०२) भाजीपाला रोपमळे, फळरोपमळे व स्थानिक उद्याने (२४०१ १७२२)

(०२-मजूरी) या लेखाशिर्षखाली सन २०२१-२२ करिता उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा. सदर रक्कम कोषागारातून आहरीत व वितरीत करण्यासाठी उप विभागीय कृषि अधिकारी, बीड यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय विधी व न्याय विभाग, औरंगाबाद यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.०९/२०२१, दि.१८/१/२०२१ रोजीचे अभिप्राय व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२८६/२०२१/व्यय-१, दि.२०/०९/२०२१ रोजीच्या अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२०१६४०५५८७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रांचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2021.10.20 16:45:17 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत अग्रेषित:-**

१) आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य पुणे.
२) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई/ नागपूर.
४) सह संचालक (आस्थापना),कृषि आयुक्तालय,पुणे.
५) सह संचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भ०वन, ५ वा माळा मुंबई-३२.
६) विभागीय कृषि सह संचालक, औरंगाबाद.
७) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,बीड,
८) जिल्हा कोषगार अधिकारी, बीड,
९) निवड नस्ती/कार्या.१३-अे